# हॅरीचे खेचर

लेखनः बारबरा एन पोर्ट

चित्रः यूसी अबुलोफिया

मराठी: अश्विनी बर्वे



# हॅरीचे खेचर

लेखनः बारबरा एन पोर्ट

चित्रः यूसी अबुलोफिया

मराठी: अश्विनी बर्वे



डैबरा और रसल के लिए

- बी.ए.पी.

एवी के लिए

- वाय.ए.





मी हॅरी, एका खेचराचा मालक आहे. त्याला मी एक स्पर्धेत जिंकलं होतं. पन्नास किंवा त्याच्यापेक्षा कमी शब्दात सांगा की तुम्हाला जॅम पॉपस किती आवडतात. प्रत्येक प्रविशिका बरोबर जॅम पॉपसच्या डब्याकहा वरचा भाग आणि दहा लेबल जरूर पाठवा.

मी ही लिहलम होतं.

मी हॅरी आहे. मला जॅम पॉपस खूप आवडतात. माझ्या वडिलांना पण आवडतात. बाबा त्यांचे पॉपस टोस्टर मध्ये घालून गरम करतात. मी तळलेल्या अंड्यामध्ये बुडवतो. मी त्यांना डिप्सी डूडल म्हणतो.

“आपले दात घासायला विसरू नको.” बाबा प्रत्येकवेळी नाष्टा झाला की सांगतात. ते दातांचे डॉक्टर आहेत ना! माझे दात अजून पर्यन्त किडले नाहीत.

“या हू!’ मी ओरडलो. “मी स्पर्धा जिंकली.”

बाबा रुग्ण तपासत होते तसेच त्यांनी बाहेर डोकावले.

“हा आरडाओरडा कशासाठी?

त्यांनी विचारले.

मी त्यांना मला आलेले पत्र दाखवले. ’





''प्रिय हॅरी मॉस्कोवित्ज़ः

अभिनंदन!

तुम्ही जॅम पॉप्स स्पर्धेत पहिले स्थान मिळवले आहे. पहिल्या नंबरला खेचर बक्षीस मिळणार आहे. तुमचे बक्षीस घेण्यासाठी

कृपया १-८००-१२३-४५६७ वर संपर्क करा...' आणि खाली छोट्या अक्षरात लिहले होते:

"जिंकणाऱ्या व्यक्तीला हवे असेल तर खेचरच्या बदल्यात सायकल पण घेऊ शकतात."

''अभिनंदन!'' बाबा म्हणाले.

"एका नवीन सायकलीशिवाय चांगले काही असू शकत नाही."

"धन्यवाद!" मी म्हटले.

''जर तुम्हाला चालणार असेल तर मी खेचर घेऊन येईल."

सायकल तर माझ्याजवळ आहे."



“‘*माज़ेल तोव*!’’ बाबा म्हणाले.

त्याचा अर्थ होतो, अभिनंदन!

“मग तुझ्याकडे दोन–दोन सायकली होतील.”

मला वाटलं की ते असेच म्हणतील.



‘‘प्लीज़, प्लीज़, प्लीज़,’’ मी विनवणी केली.

‘‘मला नेहमीच एक खेचर हवे होते.”

बाबांनी दीर्घ श्वास घेतला.

‘‘हॅरी माझ्यावर विश्वास ठेव, या घरात खेचर आणणे शक्य नाही.

‘‘खरं आहे,” मी म्हटले.

‘‘तो घरी नाही राहणार. त्यांना तसेही बाहेर राहायला आवडते.” मी म्हटले.

‘‘बरोबर, पण बाहेरचा अर्थ गावात,” बाबा म्हणाले. “आपण उपनगर मध्ये राहतो.

आणि इथले हेच नियम आहेत. त्यांनी लिहले, खेचर नाही,” बाबा म्हणाले.

एवढे म्हणून बाबा आपल्या खोलीत निघून गेले.





थोड्या वेळाने आत्या भेटायला आली.
मी तिला पत्र दाखवले.

“अभिनंदन! हॅरी” ती म्हणाली.

“तुला माहीत आहे मलाही नेहमी एक खेचर हवे होते.” बाबा खाकरत म्हणाले. “तसे तर सायकल एकदम चांगला पर्याय आहे.” त्यांनी घाईने पुढचे वाक्य जोडले. तेव्हा माझ्या मनात आलं.

‘‘आत्या माझे खेचर तुझ्याकडे राहू शकते का?” मी आत्याला विचारले. “तो गर्लल सोबत करेल.”

गर्ल माझी कुत्री आहे. ती आत्याकडे राहते. रोझ आत्याने नकाराची मान हलवली. “माफ कर हॅरी,” ती म्हणाली. “कुत्रं ठेवणे वेगळे पण खेचरची गोष्ट वेगळी आहे. आणि मग त्या भागाचे काही नियम सुद्धा तर आहेत.





दुसऱ्या दिवशी मी शाळेत डॉरकस आणि एडीसही याबद्दल बोललो. आम्ही त्या भागातल्या नियमाबद्दल बोललो. “कदाचित या नियमाचा अर्थ असा असू शकेल की खेचर इथे पूर्णवेळ राहू शकणार नाही.” एडीने काही वेळ विचार करून म्हटले.

“जर तुझे खेचर पाहुणा म्हणून काही वेळ आले तर?”

“पाहुणा म्हणून?” मी विचारले.

“हो, मित्रा, आधी ते तुझ्या पाहुणा होईल, मग माझा, नंतर डॉरकसचा असेच चालू ठेवायचे.

“विचार तर चांगला आहे,” डॉरकस म्हणाला.

शाळा सुटल्यावर त्यांनी आपल्या आईबाबांना विचारले.



''अजिबात नाही,'' एडीची आई म्हणाली.



''नाही, नाही, नाही, नाही," डॉरकसचे बाबा म्हणाले.

पण डॉरकसची मोठी बहीण सिल्वियाने डॉरकसला म्हणाली. ,

''जर मी एखादे खेचर जिंकले असते तर मी व्यवसाय सुरू केला असता."

''धंदा?'' मी डॉरकसने हे सांगितल्यावर म्हटलं.

''बेशक! सिल्विया म्हणाली की सगळ्यात आधी व्यवसाय करण्याचे लायसन्स घेतले पाहिजे.



“एड़ी आणि मी तुझे भागीदार होऊ शकतो. आपण एक बोर्ड लावू या:








“आपण फोटो पण काढू शकतो आणि ते विकू शकतो.” एडी म्हणाला

“आईवडिलांना आपल्या मुलांना खेचरवर बसवून फोटो काढायला आवडेल.”





‘‘आणि ते काउबॉयच्या टोप्या घालू शकतात.”

मी म्हटले, “मी त्या भाड्याने देऊ शकतो. मागच्या वर्षी माझ्या वाढदिवसाला जी मेजवानी दिली त्यानंतर माझ्याकडे टोप्यांचा खूप संग्रह झाला आहे.”

‘‘जेव्हा या धंद्यातून खूप पैसे मिळायला लागतील तेव्हा आपण एक गाडी खरेदी करू,” डॉरकसने म्हटले.

‘‘तेव्हा आपण वाढदिवसाच्या मैफिली करून खूप श्रीमंत होऊ शकतो.”






त्या दिवशी रात्रीच्या जेवणानंतर मी बाबांना आमची योजना सांगितली. “मी जे पैसे मिळवेल तर एक बचत खात्यात टाकेन, माझ्या कॉलेजच्या शिक्षणासाठी.” मी वचन दिले आणि यावर बाबांनी दीर्घ श्वास सोडला.

‘‘हॅरी तुला अंदाज आहे का खेचर सांभाळण्यासाठी किती खर्च येतो ते?”



‘‘खेचर फक्त घास खात नाही, त्याच्यासाठी ढेप आणि व्हिट्यामिन पण खरेदी करावे लागतात. आणि  कांबळे, चारा, काठी आणि लगाम सुद्धा. देव न करो पण तो आजारी पडला तर पशू चिकित्सक बोलवावे लागेल.



आणि त्यासाठी जास्त खर्च होईल. आणि निरोगी असेल तरी त्याला लस द्यावी लागेल.

आणि काही महिन्यांनंतर त्याच्या खुराला नाल बसवावी लागेल.

बाबा एवढे बोलून श्वास घ्यायला थांबले.





मी विचार करू लागलो की बाबांना खेचराबद्दल एवढी कशी माहिती आहे.

बाबा पुढे म्हणाले, “माझ्यावर विश्वास ठेव हॅरी. तू जर तुझी सायकल विकली तर तू लवकर श्रीमंत होशील.”

ज़रूर! मी विचार केला.

पण माझ्या खेचराचे काय होईल?





‘‘माझ्या बाबांनी मला सांगितले, मी डॉरकस आणि एडीला शाळेत सांगितले.

‘‘कदाचित मला गर्ल आणि खेचराबरोबर पळून जायला पाहिजे.

‘‘म्हणजे खेचरावर बसून पळून जायची इच्छा आहे का तुला?” डॉरकसने विचारले.

‘‘पण तू पळून कुठे जाशील?” एडीने विचारले. तेव्हा माझ्या मनात विचार आला.

‘‘ओकलेहोमा, मरे आजी आजोबांजवळ. त्यांचे भुईमुगाचे शेत आहे ना,” मी म्हटले.

‘‘माझी आई जेव्हा माझ्या वयाची होती तेव्हा तिच्याकडे एक घोडा होता.” आम्ही नकाशत आकेलेहोमा बघितले.

“हे तर खूप दूर वाटते, जर रस्त्यात तू हरवला तर काय होईल?” एडीने म्हटले.



“जर तुला अटक केली तर?” डॉरकसने म्हटले, “मला वाटते महामार्गावर खेचर चलवण्यास बंदी आहे.”







“मग तुला जेलमध्ये तुझ्या वडिलांची वाट बघवी लागेल, तुझ्या खेचराचे काय हाल होतील काय माहीत? हे खूपच भितीदायक आहे.”

माझ्या डोळ्यात पाणी आले. मी डोळे बंद न करण्याचा प्रयत्न केला. मी रडतांना कोणी बघावे असे मला वाटत नव्हते.

शाळा सुटल्यावर मी रोज आत्याच्या घरी गेलो. शुक्रवारी गर्लला फिरवण्याची माझी पाळी होती.

आत्याच्या संगीत बँडचे साथीदार तिथेच होते. ते सराव करायला आलेले होते. त्यांचा सराव संपून ते त्यांचे वाद्ये आवरत होते.

‘‘हाय हैरी,’’ काहीजण म्हणाले.

“अभिनंदन!” एकाने म्हटले.

‘‘*माज़ेल तोव!*’” हर्बर्ट म्हणाला.

तो फ्रांसीसी भोंपू वाजवत असे.

“रोज कोणाला खेचर मिळत नाही.”

“”किंवा सायकल,” ड्रम वाजवणारी ल्यूसिल म्हणाली. एवढे म्हणून ते सगळे निघू लागले.



सिवा जंगली मैमीचे, जो क्लैरिनैट वाजवत असे, ती गेली नाही. रोझ आत्या, लिओ काकापण गेला नाही. ‘‘चेहऱ्यावर आनंद तर दिसू दे हॅरी, तू किती उदास दिसत आहेस. एक स्पर्धा जिंकली आहेस असे वाटत नाही.

लिओ काका म्हणाला. “घे बिस्किट खा.” रोझ आत्या म्हणाली. ‘‘जंगली मैमी आम्हाला एका खेचरच्या फार्म बद्दल सांगत होती.”

“खेचराचे फार्म?” मी आश्चर्याने विचारले. ‘‘रेड बार्न खेचर फार्म,’’

जंगली मैमीने सांगितले.

“मी तिथे मदत करायला जाते.” ती म्हणाली.

‘‘माझ्या अपघात होण्यापूर्वी मी जंगली घोड्यांच्या शर्यतीत भाग घेत असे. म्हणून माझ्या नावाच्या पुढे जंगली लावले आहे. आता मी अपंग मुलांना खेचरावर बसायला शिकवते आणि खेचरांची देखभाल करण्याचे काम करे. तुझ्या खेचराचा तिथे खरंच उपयोग होईल.”’





‘‘अर्थात निर्णय तुझा असणार आहे,” जंगली मैमी म्हणाली.

“पण मला वाटते की तुझ्या खेचराला यापेक्षा चांगले घर मिळू शकणार नाही. मी सगळे फोटो बघितले.

मला हे सर्व ऐकून फार आश्चर्य वाटले. खासकरून जंगली मॅमी नाव ऐकून. मला वाटत असे की तिच्या नावापुढे हे नाव तिच्या चाकाच्या खुर्चीमुळे पडले आहे. तिने फार्मचे काही फोटो मला दाखवले. मी लक्षपूर्वक ते बघितले. तिथली मुले खुश दिसत होती आणि खेचर पण.





मी गर्लचा पट्टा घेतला आणि तिला फिरवायला बाहेर घेऊन गेलो.

“कमीत कमी मला हे तर माहीत असेल की माझे खेचर कुठे आहे ते? आणि हे पण की त्याला चांगलं घर मिळाले आहे.” मी गर्लला सांगितलं.

“आणि त्याला दुसऱ्या खेचरांची सोबत पण मिळेल.”

‘‘तुला आत्ताच निर्णय घ्यायचा नाही” रोझ आत्या म्हणाली.

“विचार कर, वेळ घे,” लिओ काका म्हणाला. “तुझ्या वडिलांशी बोल,”

“बरोबर आहे,” जंगली मैमी म्हणाली.

‘‘व्यवस्थित विचार कर आणि जर तुला तुझे खेचर आमच्या फार्मला द्यायचे असेल तर मी सर्व व्यवस्था करेन.”

“नक्की,सांगेन.” मी म्हणालो.







रात्री जेवल्यावर मी बाबांशी बोललो.

“मला वाटतं हे खेचरासाठी आणि फार्मसाठी दोघांसाठी चांगलं आहे. पण नवीन सायकल घेतली तरी सुद्धा चांगलं होईल. पण हा निर्णय तुझा आहे.” बाबा म्हणाले.

नंतर अंथरूणावर पडून मी विचार करत होतो,निर्णय घेण्याचा प्रयत्न करत होतो.

त्या रात्री मी एक स्वप्नं बघितलं. स्वप्नात एक काउबॉय आला होता. मी एका स्पर्धेत सायकल चालवतांना खेचरावर एक दोरी फेकून त्याला पकडण्याचा प्रयत्न करत होतो. खेचर चाकाची खुर्ची चालवत होता. प्रत्येकवेळी मी त्याला पकडायला जाई त्यावेळी माझी सायकल पडत असे.





सकाळी माझे डोळे उघडले तेव्हा मी फरशी वर होतो. दात घासत असतांना मी विचार केला. “मी खेचर फार्मला देतो.” मी नाष्टाच्यावेळी बाबाला सांगितलं.



‘‘नक्की ठरवलं आहे ना?” त्यांनी विचारलं.

“हो,” मी म्हटलं.

“निदान मला माहीत तर असेल की माझे खेचर कुठे आहे ते? आणि त्याला चांगलं घर मिळालं आहे. मला अजून एका सायकलीची गरज नाही.” नंतर मी जंगली मैमीला फोन करून सांगितलं. त्या बाबांशी बोलल्या. त्या रात्री त्यांचा फोन आला.

“मी जैम पॉप्सवाल्यांशी आणि फार्ममधील लोकांशी बोलले आहे. खेचर पुढच्या आठवड्यात फार्मवर येईल. रेड बार्न फार्मच्या लोकांना तू त्यावेळी तिथे असावा असे वाटते. पुढच्या शुक्रवारी ये आणि त्यांना खेचर भेट दे.”

“मला वाटते की तू योग्य निर्णय घेतला आहेस.” बाबा म्हणाले. मला आशा आहे की ते बरोबर आहे. कारण आता निर्णय बदलण्यासाठी वेळ नाही.





शुक्रवारी खेचराची भेंट देण्याच्या कार्यक्रमाच्या दिवशी बाबा मला शाळेतून घेऊन जाण्यासाठी लवकर आले. त्यांच्या बरोबर रोझ आत्या आणि लिओ काका सुद्‌धा आले होते. मी गाडीतच कपडे बदलले. मी माझे काऊबॉयचे बूट घातले आणि आणि काऊबॉयची टोपी घातली. मी तिला आपल्या हनुवटी खाली पक्की बांधली. आशा केली की हवा खूप जोरात वाहायला नको.

जेव्हा मी फार्मवर पोहचलो तेव्हा माझे खेचर आलेले होते. आणि जंगल मैमी पण. त्यांनी मला एक गाजर दिले.

“हे तुझ्या सपाट तळव्यावर ठेव आणि खेचरला खाऊ घालतांना अजिबात हलू नकोस.” मी तसेच केलं.





लवकरच एक मोठी गाडी तिथे आली.

जैम पॉप्सची एक महिला त्यातून उतरली. बाबांनी आणि मी काही कागदांवर सही केली. वर्तमानपत्राचा एक बातमीदार आणि एक फोटोग्राफरपण तिथे आले होते.

माझ्या खेचराने गाजर खाल्ले. तो माझी टोपी कुरतडायचा प्रयत्न करू लागला. मला वाटले की त्याला मी पसंत पडलो.





त्यांनी फोटो काढले आणि काही प्रश्न विचारले. मी त्यांना या विभागाच्या नियमांबद्दल सांगितले. “तसेही एका खेचरासाठी घराच्या मागच्या जागेपेक्षा फार्म ही चांगली जागा आहे.” मी म्हटले. नंतर भेटीचा कार्यक्रम झाला.





ममी माझ्या खेचराचे लगाम धरले आणि

रेड बार्नच्या प्रमुखाने आपली काठी टेकवून एक छोटेसे भाषण दिले.

‘‘मी सर्व मुले, त्यांचे आईवडील आणि रेड बार्नच्या कार्यकर्त्यांच्या वतीने तुझे आभार मानते. आणि त्यांनी पुढे म्हटले की “तुला हवं तेव्हा तू इथे येऊ शकतो.”

“आभारी आहे, मी येईन.” मी म्हटले.

नंतर मी माझ्या खेचराचा लगाम सिडी नावाच्या छोट्याशा दिसणाऱ्या मुलीच्या हातात दिल. जी माझ्याजवळ उभी होती. तिने मला एक ट्रॉफी दिली, ज्यावर खेचराची मूर्ती होती.





तेव्हाच जोरात वारे आले आणि माझी टोपी उडाली. मी एका हाताने ती पकडली. सगळ्यांनी टाळ्या वाजवल्या. मी धन्यवाद म्हटले.



घरी येतांना मी माझी ट्रॉफी मांडीवर घेऊन बसलो होतो. त्याखाली लिहलेले होते.

हैरी मॉस्कोवित्ज़

रेड बार्न खेचर फार्मचा मित्र

मी माझी ट्रॉफी माझ्या खोलीत काउबॉय टोपोंच्या संग्रहाजवळ ठेवली.







दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रात एक फोटो छापलेला होता. त्यात सिडी, मी आणि माझे खेचर होते. मी ते काढले आणि माझ्या परिवाराच्या अल्बममध्ये ठेवले. कोणी सांगावे मी पुढच्या स्पर्धेत

रोलरब्लेडस्ची एक जोड़ी जिंकेन. ते जास्त सोप्पे होईल.

नंतर मी माझ्या सायकलवरून रोझ आत्याच्या घरी गेलो. गर्ल बाहेर बागेत होती. मी तिला भेटीच्या कार्यक्रमाबद्दल सांगितले. “सगळे नीट झाले,” मी म्हटलं.

“रेड बार्न फार्ममध्ये आता एक नवीन खेचर आहे. आणि खेचराला पण एक चांगले घर मिळाले आहे. माझ्याजवळ ट्रॉफी आहे आणि माझी टोपीपण उडाली नाही. गर्ल भुंकू लागली, जसे की तिने सगळे ऐकले होते.



“अरे हा आवाज कसला?

रोझ आत्या बाहेर दरवाज्यात येऊन म्हणाली.

“ओह,  हैरी तू आहेस.

आत ये, मी आत्ताच बिस्किटे केली आहेत. मी तिच्या मागे बिस्किट खायला गेलो. आणि गर्ल माझ्यामागे आली.

